आदिवासी विकास सेवा, गट- अ मधील सहआयुक्त या पदावरील तात्पुरत्या पदोन्नतीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बढती १२२३/प्र.क्र.६० /का.१५**
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
तारीख: १० जूलै, २०२३.

**वाचा :-**

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही २०१८/प्र.क्र.१५९/का-१२ , दि.०१/०८/२०१९.

२) सामान्य प्रशासन विभाग, शासन अधिसूचना क्र.एसआरव्ही-२०२०/प्र.क्र.४९/ का.१२, दि.१४/०७/२०२१.

**शासन निर्णय:-**

आदिवासी विकास सेवेतील उपायुक्त / उपसंचालक / प्रकल्प अधिकारी (श्रेणी-१) (वेतनस्तर S-२३ : ६७७००-२०८७००) या संवर्गामधील अधिकाऱ्यांना सहआयुक्त गट- अ या संवर्गात (वेतनस्तर S-२५ : ७८८००-२०९२००) या आदेशान्वये तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नतीने नियुक्ती देण्यात येत आहे.

२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. एसआरव्ही २०१८/प्र.क्र.१५९/का-१२, दि.०१/०८/२०१९ मधील तरतुदींनुसार खालील तक्त्यातील अधिकाऱ्यांना त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र.३ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी तात्पुरत्या पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | तात्पुरत्या पदोन्नतीने पदस्थापनेचे पद | शेरा |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्रीम. अमिता पां. पिल्लेवार | सह आयुक्त, अ.ज.प्र.त.समिती, गोंदिया | रिक्त पदावर |
| २. | श्री.मनोज चव्हाण | सह आयुक्त, अ.ज.प्र.त.समिती, यवतमाळ | रिक्त पदावर |
| ३. | श्री. दिनेश तिडके | सह आयुक्त, अ.ज.प्र.त.समिती, किनवट | रिक्त पदावर |

३. वरील अधिकाऱ्यांना देण्यात आलेली तात्पुरती पदोन्नती ही खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

१) मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र. २८३०६/२०१७ च्या अधिन राहून पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दि.२५/०५/२००४ स्थित सेवाजेष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात भरण्याबाबत सा.प्र.वि./१६-ब कार्यासनाच्या दि.०७/०५/२०२१ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सूचनांनुसार सदर मान्यता देण्यात येत आहे. तसेच दि.०७/०५/२०२१ च्या शासन निर्णय प्रकरणी मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आले असून, त्यावरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

२) रिट पिटीशन स्टॅम्प नं. १०८७६/२०२१ व रिट पिटीशन स्टॅम्प नं.१०८७८/२०२१ मध्ये मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी दि.२५.०५.२०२१ रोजी दिलेल्या निर्णयानुसार सदर पदोन्नती नमूद रिट याचिकेत होणाऱ्या निर्णयाच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

३) सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरूपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील व पदोन्नतीसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा व सेवाज्येष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही.

४. तात्पुरत्या पदोन्नतीने नियुक्ती देण्यात आलेल्या पदोन्नत अधिकाऱ्यांनी त्यांच्या नियुक्तीचे आदेश निर्गमित झाल्यापासून तात्काळ रुजू होणे आवश्यक आहे. संबंधित अधिकारी विहित मूदतीत संबंधित नियुक्तीच्या रुजु झाले नाही तर संबंधित अधिकाऱ्यांचा अनुपस्थितीचा कालावधी अकार्यदिन (dies non) म्हणून गणला जाईल. या तरतूदींच्या अनुषंगाने प्रस्तुत आदेशामधील अधिकाऱ्यांनी पदोन्नतीच्या पदस्थापनेवर तात्काळ रुजू होण्याची दक्षता घ्यावी.

५. तात्पुरत्या पदोन्नतीने नियुक्ती देण्यात आलेल्या अधिकाऱ्यांना नवीन पदावर रुजू होण्यासाठी कार्यालय प्रमुख / विभागप्रमुखांनी स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन तात्काळ कार्यमुक्त करावे आणि नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ हजर होण्याबाबत संबंधिताना सूचना द्याव्यात. तसेच संबंधित अधिकाऱ्यांनी पदभार स्विकारल्यानंतर त्यांचा अहवाल आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांच्यामार्फत शासनास (pawankumar.bandgar@nic.in) ई मेल वर त्वरीत सादर करावा.

६. संबंधित अधिकाऱ्यांनी पदोन्नतीच्या पदावर हजर न होता, लोकप्रतिनिधीं मार्फत पदस्थापनेत बदल करण्याबाबत शासनावर दबाव आणल्यास ते महाराष्ट्र नागरी सेवा

(शिस्त व अपील) नियम, १९७९ मधील तरतूदीनुसार शिस्तभंगविषय कारवाईस पात्र ठरतील, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०७१०१८५११२१४२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PAWANKUMAR
BAPURAO
BANDGAR

Digitally signed by PAWANKUMAR BAPURAO BANDGAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=de4f5b7703ab4e5e10ca414432353e1fedec0ed7e9030a2b4ef40ed6f5180db0, pseudonym=5EB45DBDB7827935E861F4F138005D49199129A1, serialNumber=DDD9DA8FA21A90D7D094A7A2B297309EED70A74C6C632CA84301EB132C1FB5FD, cn=PAWANKUMAR BAPURAO BANDGAR
Date: 2023.07.10 18:52:40 +05'30'

**(पवनकुमार बंडगर)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१.मा. मंत्री, आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
३. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
४. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
५. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य १/२, मुंबई / नागपूर
६. महालेखापाल ( लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य १/२, मुंबई / नागपूर
७. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे / नाशिक/ अमरावती / नागपूर
८. सर्व सह /उपसचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. सर्व सहआयुक्त, अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती
१०.सर्व अवर सचिव / कार्यासन अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई
११.सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
१२.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१३.संबंधित अधिकारी
१४.निवड नस्ती (का-१५)